**अर्जदाराने दिलेल्या पर्यायानुसार शासकीय निवासस्थान वाटप केल्यानंतर ते स्वीकारण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः शानिवा-१४१७/प्र.क्र.१९४/२३-अ**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: ०६ मे, २०१७.

<u>पहा</u> :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा-१५०९/प्र.क्र.३२०/०९/२३-अ, दि. १९ एप्रिल, २०११.
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा-१५११/प्र.क्र.१७७/११/२३-अ, दि.०५ ऑक्टोबर, २०१२.

**परिपत्रक :-**

बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानांचे वाटप करण्यासाठी गैरन्यायिक अधिकाऱ्यांचे ग्रेड वेतनानुसार व न्यायिक अधिकाऱ्यांचे वेतनश्रेणीनुसार अनुक्रमे संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये गट/प्रकार करण्यात आलेले आहेत. सदर शासन निर्णयानुसार वेगवेगळ्या गट/प्रकारातील अर्जदारांना कोणकोणत्या ठिकाणी (क्षेत्र) तसेच कोणत्या/कोणत्या प्रकारच्या इमारतींमध्ये शासकीय निवासस्थान अनुज्ञेय राहील, हे स्पष्ट करण्यात आलेले आहे.

२. शासकीय निवासस्थानांसाठी अर्ज करतांना अर्जदारांना त्यांच्या गट/प्रकारानुसार अनुज्ञेय असलेल्या क्षेत्रांपैकी एक किंवा अनेक क्षेत्र निवडण्याचा पर्याय उपलब्ध असतो. प्रतिक्षायादीनुसार व अर्जदाराने दिलेल्या पर्यायानुसार शासकीय निवासस्थानांचे वाटप करण्यात येते. मात्र अर्जदारांनी दिलेल्या पर्यायानुसार इमारतींमधील निवासस्थान वाटप केल्यानंतरही काही अर्जदार वाटप केलेले निवासस्थान स्विकारीत नाहीत व विशिष्ट मजल्यावरच्या व विशिष्ट क्रमांकाच्या निवासस्थानाची मागणी करतात. अर्जदारांची अशा प्रकारची मागणी उचित नाही. सबब, यापुढे अर्जदारांनी दिलेल्या पर्यायांपैकी अनुज्ञेय क्षेत्र/अनुज्ञेय प्रकारच्या इमारतींमधील निवासस्थानाचे वाटप केल्यानंतर ते निवासस्थान अर्जदाराने स्विकारणे बंधनकारक राहील. वाटप केलेले निवासस्थान मोठ्या प्रमाणात नादुरुस्त असेल तर व त्यानुसार संबंधित अभियंत्याने प्रमाणित केल्यावरच निवासस्थानाचे फेरवाटप करण्यात येईल. वाटपयोग्य निवासस्थान वाटप केल्यावर ते अर्जदाराने स्विकारले नाही तर अशा अर्जदारास दुसरे निवासस्थान वाटप केले जाणार नाही व त्याचे नाव प्रतिक्षायादीतून कमी करण्यात येईल. त्यास नंतर निवासस्थान हवे असल्यास नव्याने ऑन-लाईन अर्ज करावा लागेल.

३. वाटप केलेले निवासस्थान अर्जदाराने स्विकारल्यानंतर काही वर्षांनी संबंधित अर्जदाराने ते बदलून मागितल्यास प्रतिक्षायादीची तेंव्हाची स्थिती, त्या इमारतीमधील निवासस्थानांची परिस्थिती विचारात घेऊन योग्यवेळी निवासस्थान बदलून देण्यात येईल.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०५०६११५७३९६९०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Shivdas Mahadeo Dhule

Digitally signed by Shivdas Mahadeo Dhule
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400051, st=Maharashtra, 2.5.4.20=fd353a6a1af02b28757a9a542f2f807ba459543ed19dc809f2f150cfde4470c9, cn=Shivdas Mahadeo Dhule
Date: 2017.05.06 12:03:00 +05'30'

**( शि. म. धुळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्यमंत्र्यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
३. प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई (पत्राने)*
४. प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई (पत्राने)*
५. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अधीक्षक अभियंता, मुंबई मंडळ, मुंबई.
७. कार्यकारी अभियंता (सा.बां.), इलाखा शहर विभाग, बांधकाम भवन, मर्झबान पथ, मुंबई.
८. कार्यकारी अभियंता , मध्य मुंबई, वरळी, मुंबई - ४०० ०१८
९. कार्यकारी अभियंता, उत्तर मुंबई विभाग, अंधेरी (पश्चिम), मुंबई ४०० ०५८.
१०. कार्यकारी अभियंता, इमारती बांधकाम विभाग, कामगार हॉस्पिटल आवार, मुलुंड (प), मुंबई ४०० ०८०.
११. सक्षम प्राधिकारी, बृहन्मुंबई, जुने जकात घर, मुंबई ४०० ०२३.
१२. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
१४. निवड नस्ती.

*(पत्राने)